**जलसंपदा विभागांतर्गत करण्यांत येणा-या राज्यभरातील धरण सुरक्षा उपकरणे, प्रयोगशाळा उपकरणे, भूकंपमापक, प्रवेगमापक उपकरणे तसेच शास्त्रीय व गणिती उपकरणे इ. खरेदी करतांना तांत्रिक विनिर्देश ठरविण्यासाठी तांत्रिक समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र : खसपु - २०१५ / ( प्र.क्र. १४९ /१५ ) / यांत्रिकी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २२ डिसेंबर, २०१६

**संदर्भ** : १) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र. एमसीएन-११८४ /(१३ / ८४ )/पीआरजे-१, दि. १०.३. १९८४
२) शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र. खसपु/२०१५/(प्र.क्र.१४९ १५ )/यांत्रिकी, दि. २१.१०.२०१५
३) शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४ /प्र.क्र.८२/भाग- III /उद्योग ४ दिनांक ३०.१०. २०१६ व दि.१.१२. २०१६
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. समिती ०२१६ / ( प्र.क्र. २१ / २०१६ ) / यांत्रिकी, दि. ३.२.२०१६
५) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र.तांत्रिक समिती ०११६ / ( प्र.क्र. २१ / २०१६ ) / यांत्रिकी, दि. १६.३.२०१६
६) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. समिती ०२१६ / ( प्र.क्र. १३ / २०१६ ) / यांत्रिकी, दि. १२.९.२०१६

**प्रस्तावना :-**

१. संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार जलसंपदा विभागाकडील विविध यंत्रसामुग्री, उपकरणे आणि भांडार साहित्य खरेदीबाबत त्यांचे वर्ग “ अ ” ते “ इ ” मध्ये वर्गीकरण करुन त्यांच्या खरेदीबाबत सल्लागार समित्यांची स्थापना करण्यात आली होती.

संदर्भ क्र. ३ येथे नमूद केलेल्या उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक ३०.१०. २०१५ व दिनांक.१.१२. २०१६ च्या शासन निर्णयान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका प्रसिध्द केली आहे. सदर नियम पुस्तिकेच्या परिच्छेद क्र. २.९.२ मध्ये नमूद केल्यानुसार सर्व प्रशासकीय विभागांना खरेदी प्रक्रिया पार पाडता यावी, यासाठी प्रत्येक प्रशासकीय विभाग/कार्यालयांतर्गत खरेदी समिती गठीत करावयाची आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ४ अन्वये खरेदी सल्लागार समिती ( अ ) च्या जागी राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्यात आलेली आहे.

तसेच नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रं. २.९.२ नुसार एखादया यंत्र सामुग्रीची / उपकरणाची खरेदी करण्याचे ठरल्यानंतर विभागाची गरज लक्षात घेवुन त्या अनुषंगाने नि:पक्षपातीपणे तांत्रिक विनिर्देश ठरविण्यासाठी संबंधित विभागास तांत्रिक समिती गठित करुन तांत्रिक समितीची रचना व कार्यपध्दती निश्चित करण्याबाबत तरतूद आहे. त्यानुसार संदर्भीय शासन निर्णय क्रं.५ अन्वये जलसंपदा विभागांतर्गत करण्यात येणा-या विविध प्रकारच्या यंत्र सामुग्रीची खरेदी करतांना तांत्रिक विनिर्देश ठरविण्यासाठी तांत्रिक समितीचे गठन करण्यात आलेले आहे.

याच धर्तीवर जलसंपदा विभागांतर्गत राज्यभरातील धरण सुरक्षा उपकरणे, प्रयोगशाळा उपकरणे, भूकंपमापक, प्रवेगमापक उपकरणे तसेच शास्त्रीय व गणिती उपकरणे अशा प्रकारची खास तांत्रिक उपकरणे

खरेदी करतांना तांत्रिक विनिर्देश ठरविण्यासाठी तांत्रिक समितीचे गठन करण्यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या पार्श्वभूमीवर पुढीलप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

## शासन निर्णय :-

संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयानुसार ( ब ) नुसार वर्गीकरण केलेली जलसंपदा विभागांतर्गत राज्यभरातील धरण सुरक्षा उपकरणे, प्रयोगशाळा उपकरणे, भूकंपमापक, प्रवेगमापक उपकरणे तसेच शास्त्रीय व गणिती उपकरणे इ. ची खरेदी प्रक्रीया राज्यस्तरावर एकत्रिपणे होत असल्याने सदर खरेदी राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीमार्फत करण्यात यावी. तसेच जलसंपदा विभागांतर्गत राज्यभरातील धरण सुरक्षा उपकरणे, प्रयोगशाळा उपकरणे, भूकंपमापक, प्रवेगमापक उपकरणे तसेच शास्त्रीय व गणिती उपकरणे अशा प्रकारची खास तांत्रिक उपकरणे खरेदी करतांना तांत्रिक विनिर्देश ठरविण्यासाठी तांत्रिक समितीचे गठन पुढीलप्रमाणे करण्यांत येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य अभियंता, ( नियोजन व जलविज्ञान ) जलविज्ञान प्रकल्प, दिंडोरी मार्ग, नाशिक | : अध्यक्ष |
| २. | अधीक्षक अभियंता, धरण सुरक्षितता संघटना, दिंडोरी मार्ग, नाशिक | : सदस्य |
| ३. | अधिक्षक अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना ( धरण ) दिंडोरी मार्ग, नाशिक | : सदस्य |
| ४. | संशोधन अधिकारी, उपकरणे संशोधन विभाग, धरण सुरक्षितता संघटना, दिंडोरी मार्ग, नाशिक | : सदस्य सचिव |

## समितीची कार्यपध्दती :-

१ ) जलसंपदा विभागांतर्गत राज्यभरातील धरण सुरक्षा उपकरणे, प्रयोगशाळा उपकरणे, भूकंपमापक, प्रवेगमापक उपकरणे तसेच शास्त्रीय व गणिती उपकरणे अशा प्रकारची खास तांत्रिक उपकरणे खरेदी करतांना कामाची उपयुक्तता तपासून सदर उपकरणांचे तांत्रिक विनिर्देश अंतिम करणे.

२ ) जलसंपदा खात्यास आवश्यक असलेल्या व सध्या बाजारात असलेल्या नवीन तंत्रज्ञान वापरलेल्या उपकरणांचा सर्वकष आढावा घेणे.

३ ) उपलब्ध उपकरणांची तांत्रिक अचूकता ( Accuracy ),कामगिरी ( Performance ) तसेच विक्रीपश्चात सेवा, हमी कालावधी ( Warranty Period ), किमान देखभाल व दुरुस्ती इ.बाबी तपासुन सदर उपकरणांचे तांत्रिक विनिर्देश अंतिम करणे.

४ ) उपरोक्त सर्व बाबींचा विचार करुन जलसंपदा विभागाच्या आवश्यकतेनुसार तांत्रिक विनिर्देश अंतिम करणे व राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीस खरेदीदार विभागाची गरज लक्षात घेवून वेळोवेळी अहवाल सादर करणे.

५ ) या प्रक्रियेव्दारे तांत्रिक विनिर्देश अंतिम केल्यानंतर निधीच्या उपलब्धतेनुसार उपकरणे खरेदीसाठी **ई-निविदा** प्रक्रिया राबविणे. त्यानुसार निविदा मुल्यांकन अहवाल तयार करुन राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीस मान्यतेसाठी सादर करणे.

६ ) उपरोक्त खरेदीसंदर्भातील राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीच्या निर्णयाचे / बैठकीचे वेळेस सदरहु तांत्रिक समितीचे अध्यक्ष हे निमंत्रित सदस्य म्हणून उपस्थित राहतील.

७ ) राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीच्या मान्यतेनंतर उपकरणे खरेदीबाबतची पुढील खरेदी प्रक्रीया पूर्ण करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२२१३५६१८५८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Tirmanwar Santosh Ramkishan

Digitally signed by Tirmanwar Santosh Ramkishan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf0117ad341668a72bc3fcc8a83a2fab1d9b23e2ae276141178afc4dc8b5d790, serialNumber=37b5be33c57130083d7c9245fb12e91e0019861744c920676df5a5236c14b3a2, cn=Tirmanwar Santosh Ramkishan
Date: 2016.12.22 13:59:31 +05'30'

**( सं.रा. तिरमनवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग

**प्रति,**

१) मा. मंत्री (जलसंपदा), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा. राज्यमंत्री (जलसंपदा), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) प्रधान सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
६) सचिव ( लाक्षेवि ) , जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७) सचिव ( प्रकल्प समन्वय ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
९) महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) संचालक, लेखा व कोषागारे, प्रशासकीय इमारत, मुंबई.
१२) संचालक, उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता,मेरी,दिंडोरी, नाशिक
१५) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी ), पत्रपेटी क्र. ५०४, कांचनवाडी, पैठणरोड, औरगांबाद
१६) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१७) मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदर विभाग, नाशिक.
१८) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१९) मुख्य अभियंता (द. व. प्र.) व सह सचिव यांचे स्वीय सहायक.
२०) उप सचिव (मो.प्र.१) यांचे स्वीय सहायक.
२१) आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
२२) सहायक संचालक (लेखा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) यांत्रिकी कार्यासन संग्रहार्थ.